२०११०१०९१०११५६१५६००१

**मा.लोक न्यायालयासमोर तडजोडीसाठी ठेवण्यात येणा-या भूसंदर्भामध्ये तडजोडीनंतर तातडीने तडजोडीची रक्कम अदा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

महसूल व वन विभाग

शासन परिपत्रक क्र. एलक्यूएन ०१/२०११/प्र.क्र.३०/अ-२

मंत्रालय, मुंबई -४०००३२

दिनांक : १७.१२.२०११

**वाचा:-** शासन निर्णय महसूल व वन विभाग समक्रमांक दिनांक १३ ऑक्टोंबर, २०११

**प्रस्तावना:-**

शासन निर्णय महसूल व वन विभाग समक्रमांक दिनांक १३ ऑक्टोंबर, २०११ अन्वये मा.लोक न्यायालयासमोर तडजोडीसाठी ठेवण्यास येणा-या भूसंदर्भामध्ये मुल्यांकन ठरविण्यासाठी उच्चाधिकार समितीची स्थापना करण्यात आली असून मा.लोक न्यायालयासमोर तडजोडीसाठी जिल्हाधिकारी व विभागीय आयुक्त यांच्या वित्तीय अधिकारात वाढ करण्यात आलेली आहे. मा.लोक न्यायालयामध्ये तडजोड झाल्यानुसार रक्कम प्राप्त होण्यासाठी रिट याचिका क्रमांक. ६५२९/२०११ व इतर चार रिट याचिका मा. उच्च न्यायालय औरंगाबाद येथे दाखल झालेल्या असून सदर रिट याचिकेच्या अनुषंगाने मा. उच्च न्यायालय औरंगाबाद यांनी दिनांक १ डिसेंबर, २०११ रोजी निर्णय देतांना अशी अपेक्षा व्यक्त केली आहे कि, शासनाने वरील शासन निर्णय दिनांक १३ ऑक्टोंबर, २०११ अन्वये जिल्हाधिकारी / विभागीय आयुक्त यांना प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार तडजोड करण्यासाठी शासन मान्यतेची आवश्यकता राहणार नाही, याबाबत शासनाने खातरजमा करावी तसेच मा. लोक न्यायालयासमोर तडजोड झाल्यानंतर तडजोडची रक्कम एका विशिष्ट कालावधीमध्ये अदा व्हावी यासाठी शासनाने धोरणात्मक निर्णय घ्यावा.

मा. उच्च न्यायालयाच्या वरील निर्णयाच्या अनुषंगाने नमूद करण्यात येते कि, जिल्हाधिकारी व विभागीय आयुक्त यांना वरील दिनाक १३ ऑक्टोंबर, २०११ च्या अन्वये मा. लोक न्यायलयसमोर तडजोड करण्यासाठी शासन मान्यतेची आवश्यकता नाही. तसेच मा. लोक न्यायालयासमोर तडजोड झाल्यानंतर तडजोडीची रक्कम कोणत्याही परिस्थितीत वरील शासन निर्णयाद्वारे विहीत केलेल्या सहा महिन्याच्या कालावधी पूर्वी अदा करण्याच्या अनुषंगाने खालीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहे.

१ मा.लोक न्यायालयासमोर तडजोड झाल्यानंतर तडजोडीची रक्कम भुसंपादन संस्थेने /भूसंपादन संस्थेच्या प्रशासकीय विभागाने त्यांच्या चालू वर्षातील उपलब्ध मंजुर अनुदानातून प्राथम्य क्रमांने जास्तीत जास्त सहा महिन्यापूर्वी निधी उपलब्ध करुन देण्यास बंधनकारक राहील.

२. वरीलप्रमाणे विहीत कालावधीत निधी उपलब्ध करुन न दिल्यास पुढील न्यायालयीन प्रक्रियेस तथा अवमान याचिकेस संबंधीत भूसंपादन संस्था तथा भूसंपादन संस्थेचे प्रशासकीय विभाग सर्वस्वी जबाबदार राहतील. त्याबाबत कोणतीही जबाबदारी जिल्हाधिकारी कार्यालय तथा महसूल व वन विभागाची राहणार नाही.

३. सर्व जिल्हाधिकारी यांनी भूसंपादन अधिनियम १८९४ कलम १८ अन्वये त्यांच्या जिल्ह्यातील वेगवेगळया न्यायालयात डिसेंबर २०११ अखेरपर्यंत दाखल असलेल्या प्रकरणांचा मा. लोक न्यायालयासमोर तडजोड करण्याच्या अनुषंगाने विभागनिहाय आढावा घ्यावा व मा. लोक न्यायालयासमोरील अपेक्षीत तडजोड विचारात घेवून आवश्यक तेवढया निधीची तरतूद करुन ती उपलब्ध करुन देण्यासाठी संबंधित भूसंपादन संस्था तथा भूसंपादन संस्थेचे प्रशासकीय विभाग यांच्याकडे विनंती करावी. त्या त्या विभागाने त्यांच्या उपलब्ध योजनेतर / योजनांतर्गत अनुदानातून हा निधी उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे.

सदरचे परिपत्रक वित्त विभागाच्या मान्यतेने त्यांचे अनौपचारीक संदर्भ क्रमांक **विवि/शिकाना /२२५/व्यय-९, दिनांक १७.१२.२०११** ला अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्याचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**(म.ओं.वानखेडे)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग

**प्रति,**

प्रधान सचिव,वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नियोजन विभाग (रो.ह.यो.),मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, कृषी विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त
सर्व जिल्हाधिकारी
प्रबंधक मा.उच्च न्यायालय, मुंबई/नागपूर/औरंगाबाद (पत्राने)
सदस्य सचिव, महाराष्ट्र राज्य निधी सेवा प्राधिकरण, १०५ उच्च न्यायालय, (पी.डब्ल्यू. डी.) बिल्डींग फोर्ट, मुंबई ४०० ०३२ (पत्राने)
महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय,मुंबई
सर्व मंत्रायलीन प्रशासकीय विभाग
वेब कॉऑर्डीनेटर, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यासने-अ-१,अ-३ व अ-४ महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई
निवडनस्ती (अ-२)